**सन १९९१ च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचाऱ्यांना नियुक्तीनंतर मराठी टंकलेखनाचे प्रमाणपत्र सादर करण्यास मुदतवाढ देण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्र.एईएम-१०९८/प्र.क्र.१८/९९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ११ नोव्हेंबर, २००२

वाचा :- १) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक:एईएम-१०९२/३६५५/प्र.क्र.९०/९२/१६-अ, दि.३१.५.१९९३.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक:एईएम-१०९४/१६७/प्र.क्र.१५/९४/१६-अ, दि.३०.५.१९९४.
३) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक:एईएम-१०९७/प्र.क्र.७७/९७/१६-अ, दि.१२.३.१९९८.
४) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक:एईएम-१०९८/प्र.क्र.१८/९९/१६-अ, दि.१०.८.१९९९.

## शासन निर्णय

सन १९९१ च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचाऱ्यांनी शासन सेवेत नियुक्ती झाल्यानंतर संदर्भाधीन क्र.४ च्या आदेशानुसार मराठी टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र आदेशाच्या दिनांकापासून २ वर्षाच्या मुदतीत म्हणजेच दि.९.८.२००१ पर्यंत प्राप्त करून घ्यावे अशी सवलत संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये काही अटीवर देण्यात आली होती. परंतू अद्याप या विहित कालावधीत असे प्रमाणपत्र प्राप्त न करू शकलेल्या काही कर्मचा-यांनी शासनाकडे मुदतवाढ देण्याची मागणी केल्यामुळे याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. यासंदर्भात शासन असे आदेश देत आहे की, संदर्भाधीन शासन निर्णय, क्र.४ च्या परि.२ मधील विहित अटी विचारात घेऊन **ज्या कर्मचा-यांच्या नियुक्त्या दि. ९.८.२००१ पूर्वी करण्यात आल्या आहेत व त्यामधील जे कर्मचारी शासकीय वाणिज्य मराठी टंकलेखनाचे प्रमाणपत्र अद्याप सादर करू शकले नाहीत, अशा कर्मचा-यांना या आदेशाच्या दिनांकापासून एक वर्षापर्यंत मराठी टंकलेखनाचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र सादर करण्यास मुदतवाढ देण्यात यावी. या कर्मचा-यांनी या कालावधीत मराठी टंकलेखनाचे प्रमाणपत्र सादर न केल्यास त्यांच्या नियुक्त्या तात्काळ संपुष्टात आणाव्यात. त्याचप्रमाणे यापुढे ज्या पदाकरीता सेवा प्रवेश नियमानुसार मराठी टंकलेखनाची अट विहित करण्यात**

( कृ. मा. प. )

आली आहे, त्या पदावर १९९१ च्या जनगणना कर्मचा-यांची नियुक्ती ही मराठी टंकलेखनाचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र सादर केल्यावरच करण्यात यावी.

३. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( द. दा. देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
मंत्रालयीन विविध विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व इतर विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* **पत्राने.**